**सन २०२१-२२ या वित्तिय वर्षात रुग्णालयीन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०२०/प्र क्र ५२२/आरोग्य -५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ८ व १० वा मजला
दिनांक: ३१ मार्च ,२०२२

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग ,शासन निर्णय क्रमांकः, कुनिका २०११/प्र क्र ३२१/ आरोग्य-५, दि. २१ मार्च, २०१२

२) सार्वजनिक आरोग्य विभाग ,शासन निर्णय क्रमांकः, कुनिका २०२०/प्र क्र ५२२/ आरोग्य-५, दि. २७ सप्टेंबर, २०२१

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१ , १४ ऑक्टोबर, २०२१

४) सह संचालक, आरोग्य सेवा, (कुष्ठ व क्षय), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/अनुदानशाखा/रुग्णालयीन प्रस्ताव/५६८५-८८/२२, दि.१८/०२/२०२२

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयानुसार रुग्णालयीन तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी रु.२,२००/- प्रमाणे प्रतीरुग्ण व दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरीता सन २०२१-२२ या वित्तिय वर्षातील तरतूदीमधील रुग्णालयीन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२१-२२ या वर्षाकरीता रुग्णालयीन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना मागणी क्रमांक आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य उपशिर्ष (०१)(१८) कुष्ठरोग्यांसाठी सहायक अनुदाने (२२१० ०६८३) मूळ अनुदान या उद्दिष्टाखाली रु.५,००,००,०००/-(रुपये पाच कोटी) इतके अनुदान अर्थसंकल्पित करण्यात आले होते. तथापि सन २०२१-२२ करिता नमूद लेखाशिर्ष अंतर्गत रुपये ३७५.०० लक्ष ऐवढी तरतूद सुधारित अंदाज नुसार केलेली आहे. सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात सदर

अनुदानातून रु. १,५१,७०,१८७/- (रु. एक कोटी एक्कावन्न लाख सत्तर हजार एकशे सत्तेऐंशी फक्त) इतक्या रकमेचे सहायक अनुदान संदर्भिय क्र. २ शासन निर्णय दि. २७/०९/२०२१ अन्वये यापूर्वीच वितरीत करण्यात आले आहे.

२. खालील संस्थेस नमूद केलेल्या कालावधीसाठी रु. ९३,५३,१७९ /- ( रु. त्र्याण्णव लाख त्रेपण हजार एकशे एकोणऐंशी रुपये फक्त) इतके सहायक अनुदान संदर्भिय क्र. १ च्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचेनाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | महारोगी सेवा समिती, आनंदवन, वरोरा, जि.चंद्रपूर | ऑक्टोबर,२०२१ ते डिसेंबर २०२१ | १८०० | रु.३९,६०,०००/- |
| २ | विदर्भ महारोगी सेवा मंडळ तपोवन, जि अमरावती | ऑक्टोबर,२०२० ते डिसेंबर २०२१ | १३७५ | रु.२९,३०,७५९/- |
| ३ | दि लेप्रसी मिशन कोठारा, लेप्रसी हॉस्पीटल ता अचलपूर, जि-अमरावती | ऑक्टोबर,२०२० ते सप्टेंबर २०२१ | ४७७ | रु.४,७१,६०७/- |
| ४ | महारोगी सेवा समिती दत्तपूर, जि-वर्धा | जुलै,२०२० ते सप्टेंबर २०२१ | ७१७ | रु.१५,६०,१२६/- |
| ५ | रिचर्डस ॲण्ड लेप्रसी हॉस्पीटल मिरज, जि-सांगली | जुलै,२०२० ते सप्टेंबर २०२१ | ३७९ | रु.४,३०,६८७/- |
| | **एकूण** | | **४७४६** | **रु.९३,५३,१७९/-** |

३. सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात रुग्णालयीन तत्त्वावर स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरणाचा प्रस्ताव, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२१ निधी वितरणाबाबत वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.०६ एप्रिल, २०२१ व १४ ऑक्टोबर, २०२१ सोबतच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.९ समोर नमूद तपासणी सूचीतील क्र.१ ते १० मधील सर्व अटींची पूर्तता केली असल्याचे प्रमाणपत्र सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षय रोग) यांनी सादर केले आहे. तसेच सन २०२१-२२ या वित्तिय वर्षात रुग्णालयीन तत्त्वावर स्वयंसेवी संस्थांना यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे संबंधीत संस्थांच्या उपयोगिता प्रमाणपत्र संचालनालयाने सादर केले आहे.

४. सहसंचालक (कुष्ठ व क्षय), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले असून त्यांनी वरील अटी पुर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी.

तसेच सदर अनुदानाशी संबंधित देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करणेसाठी सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये व खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

५. याबाबतचा खर्च सन २०२१-२२ या वर्षाकरीता मागणी क्रमांक आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य उपशिर्ष (०१)(१२) कुष्ठरोग्यांसाठी सहायक अनुदाने (२२१० ०६८३) मूळ अनुदान या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ६ एप्रिल, २०२१ व १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये त्या विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०११४३५१८३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Tanaji Dhondiram Saravane
Date: 2022.03.31 16:42:44 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

**(तानाजी सरावणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१)महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखावअनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.
२) आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य भवन मुंबई.
३)जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५)निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६)संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई
७)सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे

८)सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

८)वित्त विभाग, (व्यय.१३) मंत्रालय, मुंबई.

९)सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई

१०)निवडनस्ती (आरोग्य-५)